कांचे मुलगे एकशें चालिसांपेक्षां अधीक बुडून मे-
ले. रोएन शहरांतील एक खाटकी त्या गलब-
तांत होता, तेवढा मात्र एक शिडाला चिकटून रा-
हून वांचला; त्यास दुसरे दिवशीं कोणी कोळ्या
नीं बाहेर काढिला. तो खाटकी जा वेळेस समु-
द्रांत पोंहत होता, त्या वेळेस तो गलबताच्या क्या-
पटन फिझस्तीफन त्याजवळ पोंहून आऊन,
त्यास राजपुत्र जीवंत आहे कीं काय तें विचारि-
ता झाला. खाटक्यानें राजपुत्र मेला असें सां-
गतांच तो बोलिला, आतां आपण वांचून फळ
काय ? असें बोलून त्याणें लागलीच बुडी मा-
रून आपला प्राण टाकिला. मग ते पाण्यांत प-
डलेले लोक ओरडत, तें कांठावर ऐकायास येई,
आणि राजाच्या गलबतावरही येई; परंतु कोण ओ-
रडतो याची बातमी लागेना. हेनरी राजास ती-
न दिवस पर्यंत आशा होती कीं, आपला मुल-
गा इंग्लंडांतील कोणत्या तरी बंदरीं उतरला
असेल. चवथे दिवशीं त्यास कोणी येऊन तें

मुलाचें

मुलाचें वर्तमान सांगीतलें, त्यावेळेस तो मूर्छित हो-
ऊन पडला. तेव्हांपासून तो अंतकाळपर्यंत कधीं-
ही हास्यमुख दिसला नाहीं. नंतर थोडकेच दिव-
शीं तो नार्मंडींत सेंटडेनिस या नामें लहान गां-
व आहे तेथें अजीर्ण होऊन मरण पावला. तो पं-
स्तीस वर्षे राज्य करून आपले वयाचे सतुसष्टावे
वर्षीं मेला. त्याणें मृत्युपत्रांत, आपली माटिल-
डा-ह्मणून मुलगी होती, तिणें सर्व राज्य करावें अ-
सें लिहून ठेविलें.

## प्रकरण ७

### स्तीफन राजाची कथा

सन्न ११३५ पासून ११५४ पर्यंत

हेनरी राजाची बहीण आदिला, ब्लोई-
स शहराचा कौंट[१] यास दिली होती. तिचा पुत्र

१ कौंट ह्मणून एक त्यावेळेस अमात्यांत पदवी होती.

**स्तीफन** तो राजाचा मरणानंतर आपला प्रताप आणि शक्ति आणून, निश्चय करिता झाला कीं, मी इतके दिवस जें इच्छित होतों, तें आतां मला प्राप्त होईल. मग तो त्वरेनें **नार्मंडींतून लंडन** शहरास गेला. तेथें सर्व रयतेनें तो राजा कबूल केला. त्यानंतर धर्मपक्षपात्यांस त्याचा अभिमान पडला पाहिजे, म्हणून त्याचा भाऊ **विंचेस्तराचा बिशप** याणें सर्व धर्म पक्षपात्यांस युक्तीनें स्वाधीन करून घेतले. या रीतीनें **स्तीफनास** राज्य पदवी प्राप्त झाली.

जास लबाडीनें राज्य प्राप्त होतें, त्याचीं प्रथमचीं कर्में सर्व लोकांस आवडायाजोगीं असतात. **स्तीफनानें** आपलें राज्य दृढ करायाकरितां एक नियम ठरविला. तेणें करून प्रजांस कितिएक प्रकारची मोकळीक झाली. मोटमोटया लोकांस आपले रानांत पारध करायाची परमाणगी दिली; धर्मपक्षांचे लोकांस रिकाम्या संस्थानावर नेमणूक करायास मोकळीक

क झाली, आणि तो लोकांवर एड्वर्ड दि कन्फेसर राजाचे वेळचे नीती प्रमाणें वर्तूं लागला. आपण यापेक्षां निर्भय व्हावें म्हणून, त्याणें विंचेस्तरांनला सर्व आमदारखाना आपले हाताखालीं घातला; आणि त्यांतील कांहीं पैका देऊन पोपाकडून आपला अधिकार स्थिर केला.

त्यानंतर थोडकेच दिवशीं माटिल्डेनें राज्यपद्याविषयीं बखेडा आरंभिला. ती गलबतांतून येऊन ससेक्साचे कांठावर उतरली. तिला ग्लौसेस्तराचा अर्ल राबर्ट साहाय झाला. तो राबर्ट हेनरी राजाचे बटकीचे पोटचा मुलगा. त्या प्रसंगीं माटिल्डेचे स्वारींत एकशें चाळीस नैट[1] होते, त्याणीं लागलाच आरंदेल किल्ला घेतला. तिला त्या राज्याचा वास्तवीक अधिकार होंता, त्यामुळें साथी पुष्कळ मिळाले. म्हणून तिचा फौजेचें तेज शत्रूंचे सैन्यावर पडलें.

---

१ नैट म्हणून एक त्या काळीं साधारण प्रतिष्ठित लोकांचा किताब असे.

स्तीफन राजा माटिल्डा येते असें समजतांच ती ज्या आरंदेल किल्यांत राहिली होती, त्याव-र हल्ला करायास तयारी करून गेला. त्या कि-ल्यांत हेनरी राजाची राणीही होती, ती माटि-ल्डेचा पक्षास आंतून अनुकूल असे. आरं-देल किल्ला बळकट नव्हता, म्हणून तो स्तीफ-न राजानें सहज घेतला असता; परंतु त्यास कोणी असें समजाविलें कीं, हा किल्ला म्यान्हा-तारे राणीचा आहे; हा जबरदस्तीनें घेणें हें कर्म अनुचित.

मूर्खपणा, आणि भलेपणा या दोहोंकरून आपले अस्वार्थीचीं कर्में त्या काळचे लोक बहु-त करीत असत. तशा बुद्धीनें स्तीफन राजा-नें ब्रिस्तल किल्यावर माटिल्डा जात हो-ती तिला जाऊं दिली. ती ज्या किल्यावर पहि-ली होती, त्या सारिखाच तोही बळकट होता. मग त्या दोघानीं आपला अधिकार स्थापायाक-रितां बहुत लहान लहान लढाया केल्या; त्या

सर्वांची

सर्वांची गोष्ट सांगीतली तर फार विस्तार होईल. सारांश, राणीचें सैन्य उत्तरोत्तर वृद्धि पावत चालिलें, आणि शेवटीं ती स्तीफन राजाचा पराजय करून आपण राज्य करूं लागली. तिला राज्याभिषेक विंचेस्तर शहरांत मोठ्या उत्साहानें झाला.

नंतर माटिल्डा राणी दरबारांतील मोठमोटे सरदार लोकांचा मान राखीना अशी झाली. तसा अपमान करून घेण्याचा त्यांस फार दिवस अभ्यास नव्हता. अशा कारणानीं त्या चंचलबुद्धि लोकांचे मनांत पदच्युत स्तीफन राजाविषयीं दया आली—पुढें विंचेस्तराचे बिशपानें तो तंटा वृद्धिंगत केला. तो असा. लोकांचें मनोगत आणून त्याणें राणी जांत होती, तें लंडन शहर वेढायाचें काम आपले कितिएक स्नेही, आणि आश्रित यांचे मंडळीस सांगीतलें; आणि तसें केलें ह्मणजे शहरचा लोकानीं एकदांच दंगा करून राणीस ध-

रावी असा बेत केला. राणीला ही बातमी अगो-
दरच समजून ती **विंचेस्तर** शहरांत पळून गे-
ली; तेथेंही तिचा गुप्तशत्रू तो **बिशाप** तिजब-
रोबर गेला — मग तत्पक्षी लोकानीं तेथें राणी-
वर उघड शस्त्र धरिलें. जेथें तिला प्रथम त्या
**बिशपाचा** आशीर्वाद प्राप्त झाला होता, त्या-
ठिकाणींच ती पकडली गेली. तेथें ती कित्ती
दिवसपर्यंत होती, परंतु त्या शहरांत दुष्काळा-
चा उपद्रव झाल्यामुळें तिला तेथून बाहेर जावें
लागलें. त्यावेळेस तिचा बंधु **ग्लोसेस्तराचा**
**अर्ल** तिचे बरोबर आतें होता, त्यास धरून बं-
देंत ठेविला, आणि **स्तीफन** राजास मुक्त केलें.
या रीतीनें अकस्मात् राज्यामध्यें फेरफार झा-
ला; मग **माटिलडा** पदच्युत होऊन **आक्स-**
**फर्डांत** जाऊन राहिली, आणि **स्तीफन** रा-
जा बंदींतून सुटोन पुनः राज्य करूं लागला.

नंतर **स्तीफन** राजास दुसरा एक पुरु-
षशत्रू झाला. तो **माटिलडेचा** मुलगा **हेन-**
री

री. तो सोळा वर्षांचे वयाचा होता, त्या वेळेस मोटा अग्रगण्य, आणि राजकारभारी होईल असा दिसत असे. त्याणें लोकांचा संमतानें आपलें वंशीय राज्य पुनः आपले हस्तगत करायाचा निश्चय केला. तो स्तीफनास राज्याचा अधिकार नाहीं असें निमित्त योजून इंग्लंडांत चढावकरून गेला. त्यास बहुधा राज्यांतले सर्व मोटे मोटे लोक येऊन मिळाले.

तेव्हां स्तीफन राजानें भयभीत होऊन हेनरीचा तो आवेश निवृत्त करायासाठीं बहुत यत्न केले, परंतु ते व्यर्थ गेले. मग त्याणे त्याशीं तह केला. तेव्हां असा करार ठरला कीं, स्तीफनानें यावज्जीव राज्य करावें, आणि न्यायमनसुबींतही त्याचें नाव चालावें. स्तीफन मेल्यानंतर राज्य हेनरीनें करावें, आणि स्तीफनाचा पुत्र उइलियम यास बोलोन प्रांत आणि त्याचे बापाची खासगीची संपत्ति मात्र मिळावी. असा तह करून सर्व सभासद लो-

कांनीं

कांनी शपथा घेतल्या, तेणेकरून लोकांस परम आनंद झाला— नंतर हेनरी राजा इंग्लंडांतून गेला, आणि स्तीफन स्वस्थपणें पूर्ववत् राज्य करिता झाला. असा क्यांटर्बरींत तह झाल्यावर स्तीफन राजा सुमारें एकवर्षानें मृत्यु पावला. त्याच शहरांत त्याचें शरीर पुरलें. अशी स्तीफन राजाचा राज्याची समाप्ति झाली.

---

## प्रकरण ८



### द्वितीय हेनरी राजाची कथा

सन १९५४ पासून ११८९ पर्यंत

हेनरी राजाचे प्रथमचे राज्य रीतीवरून

न लोकांचा निश्चय झाला कीं, हा पुढें विचारानें प्रजा पालन करील— त्याणें आपला पराक्रम लक्षांत आणून जी कुनीति पूर्वीं प्रवृत्त झाली होती ती, आणि राजांचे दुर्बळतेमुळें, तसेंच भोळेपणामुळें, जे अभीढ व्यवहार चालिले होते, ते बंद करायाचा उद्योग आरंभिला. राज्यांमध्यें धुंदाई करणारी फौज होती ती तत्क्षणीं दूर केली; तसींच धर्मशाळा इत्यादिकांस जीं स्वास्थ्यें होतीं तीं पुनः पूर्ववत् चालू केलीं. आणि ख्वा कितिएक गांवचे लोकांस अशी मोकळीक दिली, कीं त्याणीं राजावांचून दुसऱ्या कोणांचा अंमल न मानितां स्वेछेनें पूर्ववत् आपलीं कर्में चालवावीं— इंग्लिश लोकांस जें स्वेछाचारित्व प्राप्त झालें त्याचें मूळ या राजानें केलेले कायदे— त्या पूर्वीं असा विवाद चालिला असे कीं, प्रजांवर सत्ता राजाची, कीं अमात्याची, कीं धर्मपक्ष्यांची असावी. नंतर या विवादांत चवथाही एक विषय शिरला. तो हा कीं, प्रजांतून धनवान् लोकही आपल्यास

राज्य कारभारांत विभाग असावा असें इछूं लागले या प्रकारानें फ्युडलसिस्तेम म्हणजे परस्पर[1] प्रभुत्व याचा नाश झाला, आणि तेव्हांपासून सर्व लोकांत स्वेछाचारित्वाविषयीं फार आस्था उत्पन्न झाली—

त्या काळचे राजामध्यें परम बलिष्ठ असा जो हेनरी राजा तो, इंग्लंड देशाचें निर्विवाद प्रभुत्व संपादून फ्रान्स् देशाचा तृतीयांशापेक्षां मोठें राज्य पावता झाला. अशा गोष्टी वाचून मनांत वाटतें कीं, त्याणें पुढेंही निर्विघ्नपणें राज्य केलें असेल; परंतु ती गोष्ट विपरीत घडली— ती अशी कीं. जेथून भयाची शंकाही नव्हती तेथूनच मोठा उत्पात होऊन त्याचा नाश झाला.

तो वृत्तांत असा- नार्मनानीं इंग्लंड

---

१ परस्पर प्रभुत्व म्हणजे धनी आणि सेवक या दोघांचा मात्र संबंध असतो; आणि राजाचें प्रभुत्व सर्वांवर नसतें त्या रीतीचें नाव.

देश

देश घेतल्यापासून प्रथम इंग्लिशांस ह्मणून जो किंचित् अधिकार प्राप्त झाला तो. टामस एबेकेट ह्मणून लंडनांत रहाणारे एके गृहस्थाचा पुत्र होता त्यास झाला – तो पुरुष लंडन शहरांतले शाळांत विद्याभ्यास करून, पारिस शहरास गेला. तेथून आल्यावर त्यास शेरिफाचे[1] आफीसांत[2] कारकुनाची जागा मिळाली – तो त्या पदापासून अनुक्रमानें चढतां चढतां, शेवटीं क्यांटर्बरीचा आर्चबिशप, याची पदवी पावला. असा तो राजाचे खालचे स्थानास चढला. ती पदवी प्राप्त होतांच तो आपले पूर्वावस्थेंतलीं हलकीं कर्में झांकावीं ह्मणून, मोठे भक्तासारिखें आचरण करूं लागला. तो देव सेवेचे मिषानें आपणास फार दुः-

---

१ राजाची आज्ञा जो सिद्धीस नेतो, आणि अपराधि लोकांस दंड लावितो, त्या कामगारास शेरिफ असें ह्मणतात.

२ काम करायाचे स्थळाचें नांव

ख

ख देत असे, तुसतीं ऊर्णावस्त्रें शरीरावर धारण करी; तीं अगदीं मळेपर्यंत बदलीत नसे; निःस्वाद अशी भाजी भाकर खाई; आणि जलमात्र प्राशन करी — तसेंच शरीरदमनार्थ अनेक प्रकारचे निग्रह केल्यामुळें, त्याचे पाठीचा कणा वरता आला होता. तो प्रतिदिवशीं तेरा दरिद्र्यांचें पादप्रक्षालन करी — असा तो तपस्व्यासारिखें आचरण दर्शवून, धर्मपक्षपात्यांची सत्ता जी पूर्वीं विपुल झाली होती, ती रक्षण करायाच्या डौल घालूं लागला — परंतु ती कमी करावी असा हेनरी राजाचा बेत होता.

थोडे दिवसां नंतर राजास एक उघड निमित्त सांपडलें; तेव्हां त्याणें मनांतील बेत सिद्धीस न्यायाचा प्रारंभ केला — तें असें. एके धर्मपक्षपात्यानें वार्सेस्तर परगण्यांतले एके गृहस्थाची मुलगी भ्रष्ट केली, आणि तिचा बाप आपली लबाडी उघड करील म्हणून त्यास मारिलें — हें त्याचें महादुष्ट कर्म पाहून सर्वलोक

परम

परम क्रुद्ध झाले. तेव्हां राजानें आज्ञा केली कीं, त्याची चौकशी न्यायाधीशानें करावी. परंतु बेकेटानें राजाचे आज्ञेस प्रतिबंध करून सांगीतलें कीं, याची चौकशी चालीप्रमाणें धर्मपक्षपात्यांचे हातूनेच व्हावी.

नंतर या गोष्टीचा निश्चय कराया करितां राजानें क्लारेंडन शहरांत मंत्र्यांची आणि धर्मपक्षपात्यांची सभा केली; आणि हा विषय त्यांस समजावून त्यांची संमति विचारिली — त्या काळीं जा सभा होत, त्या पुढील लोकांस योग्य नियम करून ठेवाया करितां होत नसत; तर राजाचा आज्ञा स्थापायास होत असत; म्हणून राजानें केलेले सर्व कायदे त्या सभेंत सर्वांचे संमतानें ठरले. ते पुढें मग क्लारेंडन कायदे या नावानें प्रसिद्ध झाले — तेथें असें ठरलें कीं, धर्मपक्षपात्यांतून कोणी अन्याय केला असतां, त्याची चौकशी राजाचा न्यायगृहांत व्हावी.

हें आणि दुसरीं लहानसान मिळोन सोळा

कलमें

कलमें ठरलीं, त्यावर सर्व धर्मपक्षपात्यानीं सह्या केल्या. **बेकेट** मात्र प्रथम अनुकूळ नव्हता, परंतु मग त्याणेंही संमति घातली. त्यावेळेस **आलिकझांडर** ह्मणून **पोप** होता; त्याणें त्यावर सबळ दोष ठेऊन तो नियम रद्द केला.

मग **बेकेटानें** राजाचा पक्ष सोडून **पोपाचा** पक्ष स्वीकारिला; ह्मणून राजाचें आणि त्याचें वांकडें पडलें. तो एके दिवशीं धैर्याइनें धर्मपक्षपात्यांचीं वस्त्रें[1] पेहरून आणि हातांत एक **क्रूस** घेऊन, राजाचे घरीं गेला. आणि आपल्या संरक्षणार्थ तो **क्रूस** रूप ध्वज हातीं घेऊन राजाजवळ बसला. तेथें त्याणें मोठ्या अभिमानानें मी धर्मपक्षी आहें असें जाणवून देशांतरीं जायास आज्ञा मागीतली. त्यास आपला अधिकार सोडून जायाची आज्ञा राजानें दिली नाहीं. ह्मणून तो मग चोरून निघोन महाद्वीपास गेला. तेथें सर्वत्र त्याचें धैर्य आणि सदाचर-

---

१ बिलायतनी लोकांस धर्मपक्षपात्यांचीं वस्त्रें साधारण लोकांपेक्षें भिन्न जातीचीं असतात.

ण पाहून लोक त्याचा मोटा सत्कार करूं लागले.

**पोप** आणि **बेकेट** या दोघांनीं असा निश्चय केला होता कीं, कसें तरी करून राजाची सत्ता नाहींशी करावी. इतर लोक त्याचें वांकडें इच्छित असत म्हणून **बेकेट** आपल्याला **क्रैस्ताची** उपमा देत असे. पुढें **बेकेटानें** लिहून असें जाहिर केलें कीं राजाचे अमुक मंत्री, तसेच जे कोणी धर्मपक्षाचा नेमलेला वसूल बंद करूं पाहत आहेत ते आणि जाणीं **क्लारंडन** कायद्यां विषयीं संमति दिली, ते सर्व धर्मास्त्यांपासून बहिष्कृत केले असत. तो **बेकेट** आणि राजा या दोघांचें सख्य व्हावया करितां लोकानीं बहुत यत्न केले; परंतु त्या दोघांत अत्यंत द्वेष होता, आणि सख्याचा अंतीं आपला किमपि अस्वार्थ होऊं नये असा त्या दोघांसही अभिमान होता; त्या मुळें ती गोष्ट सिद्धीस गेली नाहीं.

शेवटीं परस्परांचें ऐक्य व्हावें या गोष्टीचें दोघांसही अगत्य पडलें, परंतु **बेकेट** परत

इंग्लंड

इंग्लंड देशास आला त्या वेळेस, त्याणें जें औ-
द्धत्य दाखविलें तेणें करून पुनः पूर्ववत् झालें. रा-
जा जास क्षमा करितो त्याणें जसें नम्रतेनें वागा-
वें, तसें नवागतां तो पोपाच्या सर्वडामडौल करून
केंत प्रांतांतून आला – या रीतीनें तो सोथर्क प्रां-
ताजवळ आला त्या काळीं, सर्व धर्मपक्षपाती, तसे-
च नगरांतले लहान मोठे लोक, त्याला भेटायास गे-
ले. आणि आनंदानें नाना प्रकारचें गायन करू-
न त्याची स्तुति करिते झाले – नंतर तो लोकांचें
मन आपणाकडे आहे असें समजून आपल्या प-
राक्रमाचा गर्वानें जे जे कोणी पूर्वींचे प्रतिपक्षी हो-
ते त्यांची निंदा करूं लागला. प्रथमतः याकेंचे
आर्चबिशपानें त्याचे पाठीमागें हेनरीचा
ज्येष्ठ पुत्रास राज्याभिषेक केला होता, म्हणून त्या-
स पदच्युत करायाचा हुकूम केला. तसेंच लंडन
आणि साल्सबरी एथील बिशपांस त्याणें ज्ञा-
तिबाह्य केलें – कोणी एक त्यास विरुद्ध बोलिला,
एकानें त्याचे घोड्याची शेंपटी कापिली, म्हणून

त्याणें

त्याणें त्या दोघांसही जातिबहिष्कृत केले.

या रीतीनें राज्यांत बेकेटानें मोठी धुंदाई मांडिली होती, त्यावेळीं राजा हेनरी नार्मेंडींत होता त्यास बेकेटाचे उन्मत्ततेचें वर्तमान समजतांच बहुत कोप आला — जेव्हां ते जातिबहिष्कृत आणि पदच्युत केलेले बिशप राजाजवळ येऊन फिर्यादी सांगूं लागले; त्यावेळेस त्यास जो क्रोध आला त्यास अंत नाहीं. आपण ज्यास लहान पदापासून मोठ्या पदवीस चढविला, तोच आपल्यावर उलटून राज्यांत बखेडा करितो, आणि आपणास संताप देतो असें पाहून राजाचा क्रोध विशेष प्रज्वलित झाला. त्यावेळीं यार्कीचा आर्चबिशप बोलिला कीं महाराज! बेकेट जोंपर्यंत जीवंत आहे तोंपर्यंत राज्यांत स्वास्थ्य व्हायाचें नाहीं. तेव्हां राजा विचार न करितां मोठ्यानें म्हणाला कीं, मी काय करूं? मला कोणी साहाय नाहीं, नाहींतर मी या दांभिक तपस्व्याचे हातून इतके दिवस दुःख पावलों नसतों. हे शब्द ऐकून राजाचें

ज्याचे चार धैर्यवंत सेवक राजाच्या हृद्रोग निवारणार्थ उद्योग करिते झाले — तो असा- हे चार आणि दुसरे कितिएक त्यांचे सहाय मिळून क्यांतर्बरीस मोठ्या त्वरेनें निघोन गेले. ते समोर बेकेटाचे घरांत जाऊन, त्याचे औद्धत्याविषयीं पुष्कळ दुरुत्तरें बोलिले. मग ते तसेच त्या बेतानें तेथे होते. एके दिवशीं तो बेकेट संध्याकाळीं एकटा बेफाम धर्मशाळेंत मुख्य जागे जवळ जात होता, इतक्यांत राजसेवकानीं तेथें येऊन बहुत वार करून त्याचें डोकें तोडलें. मग तो बेनेदिक्त महंताचे मूर्तीपुढें गतप्राण होत्साता पडता झाला. ती मूर्ति त्याचा रक्तमांसानें भरून गेली.

नंतर बेकेटाचा मृत्यु श्रवण करून हेनरी राजा भयभीत होऊन विचार करूं लागला कीं, लोकांचे मनांत आपण त्यास मारला असा संदेह येईल. मग लोकांचीं मनें दुसरे कडे लागावीं म्हणून त्याणें अयर्लंड घ्यायाचा उद्योग आरंभिला साक्सनी लोकांनी देश घेतला त्या वेळे-

स जसे इंग्लिश लोक होते तसेच ऐरिश लो-
क त्या काळीं होते. त्यांणीं प्रथमच क्रिस्तियन ध-
र्म घेतला होता. आणि त्या नंतर तीनशें चारशें वर्षां-
नी त्या काळानुरूप विद्यादिकही त्यांणीं बरींच संपा-
दन केलीं होतीं. त्यांजवर कोणी बाहेरून येऊन
हल्ला करीत नसत, आणि ते लोक गरीब होते म्हणू-
न. कोणी राजा लोभाविष्ट होऊन त्यांस उपद्रव क-
रीत नसे; या मुळें ते एक सत्तानें होते. ते आपला का-
ळ धर्माचरणांत आणि धर्मोपयोगी विद्यांत घालवीत
असत. त्यांचा विद्या, कळा, धार्मिकता, आणि त्यां-
ची सुनीति याचा प्रत्यय अद्यापि दिसतात, म्हणू-
न त्या विषयीं कांहीं संदेह नाहीं. परंतु ते कांहीं का-
ळानें सर्व विद्यांपासून भ्रष्ट झाले. आणि पुढें सां-
गतों हें वर्तमान घडलें, त्या वेळेस ते केवळ अ-
ज्ञानानें व्याप्त होते.

जा काळीं हेनरी राजानें अयर्लंडावर
हल्ला करायाचा बेत केला, त्या वेळेस त्या बेटाचे
पांच भाग होते. त्यांचीं नावें लेनूस्तर, मीथ,
मनूस्तर

मन्स्तर, अल्स्तर, आणि कानाट. या पांच परगण्याचे पांच मांडलिक राजे होते. त्या काळीं अशी चाल होती कीं, युद्धादि प्रसंगीं त्यांतून एकास मुख्य करावा, आणि त्यास राजा असें म्हणावें; आणि पुरातन साक्सन राजा एवढी त्या मुख्याजवळ सत्ता द्यावी. त्या वेळस रोद्रिक् ओकनर म्हणून कानाटाचा राजा होता, त्यास तें पद प्राप्त झालें होतें; आणि दर्मत् एमूमरो, लेनूस्तराचें राज्य करीत असे. हा शेवटीं सांगीतला राजा अतिशय क्षुद्रबुद्धि आणि कामुक असे; म्हणून त्याणें मीथाचे राजाची कन्या उपटून नेली. नंतर मीथाचा राजानें कानाटाचे राजाशीं सख्य करून शेवटीं त्यावर चढाव करून जाऊन त्याचें राज्य घेतलें; आणि त्यास बाहेर काढून दिलें. अन्याय कर्मा करितां या रीतीचा दंड पावून, त्या एमूमरो राजानें डीएन शहरांत हेनरी राजा होता त्यास शरण जाऊन असा करार केला कीं, जर माझें राज्य तुह्मी मला परत देवविलें, तर मी

इंग्लंडाचे

इंग्लंडाचे राज्याचे ताबे खालीं येईन हेनरीनें तो करार लागलाच कबूल केला; परंतु त्यावेळेस दुसरें कांहीं नाजूक काम होतें म्हणून, त्यास सनदमात्र करून दिली; ती अशी कीं, आपल्या प्रजांतून कोणास शक्ति असेल त्याणें जाऊन त्या राजास साहाय करून त्याचें राज्य परत घेऊन त्यास द्यावें. ही सनद घेऊन दर्मोत राजा ब्रिस्तल शहरास गेला, तेथें जाऊन कांहीं यत्न करून रिचार्ड, ज्याचें उपनाव स्त्रांगबो (पेंब्रोकाचा अर्ल) त्याशीं करारपत्र केलें; त्यांत अर्लानें असें लिहून घेतलें कीं, तूं जर मला तुझी एवा नामक मुलगी देशील, आणि आपल्या मागें सर्व संपत्तीचा अधिकारी मला करिशील, तर तुझें राज्य घेऊन देईन.

असल्या अर्लाचें वचन घेऊन दर्मोत राजा चोरून अयर्लंडांत गेला; आणि तेथें फर्न्स् नामक मठ त्याणेंच स्थापिला होता त्यांत जाऊन राहिला. पुढें उन्हाळ्यांत राबर्ट फि-

झस्तीफ

झूर्स्तीफिन ह्मणून एक नैट होता तो एकशें तीस नैट, साठ इस्क्वायर आणि तीनशें तिरकमठे वाले घेऊन त्या बेटांत गेला. त्या नंतर लवकरच मारिस पेंडर्गास्त ह्मणून कोणी होता, तो दहा नैट, आणि सात तिरकमठेवाले घेऊन त्यांस मिळाला. अशीही लहान फौज घेऊन वेक्स्फर्ड शहरावर त्यांणीं आऊन हल्ला केला. तें शहर सरदारांस यावें असा ठराव झाला होता. पुढें तें सहज हस्तगत झालें. नंतर त्यांस मारिस फिझजिराल्ड सुमारें दोडशें लोकांनिशीं येऊन मिळाला. तें सैन्य पाहून ते अज्ञान लोक फार भयभीत झाले. त्या बेटांतील मुख्य राजा ओ रोडीक त्याणें त्याचें निवारण करायाचा उद्योग आरंभिला होता; परंतु तो पराजय पावला, आणि त्यांणीं त्यापासून ओलीस मनुष्यें घेतलीं. तसाच

---

१ त्या वेळेस नैट पदाचे अधिकारी होते, त्यांचे बरोबर जे प्रतिष्ठित गृहस्थ असत, त्यांचा हा किताब. सांप्रतकाळीं सर्व प्रतिष्ठित गृहस्थ आपल्या नावास हा शब्द जोडितात.

**आसरी** राजाचा पराजय करून त्यापासूनही ओलीस मनुष्यें घेतलीं.

या रीतीनें **दर्मोताला** पूर्व पदवी प्राप्त झाल्यावर, तो आपलें राज्य अधिक असावें अशी इच्छा करूं लागला. त्यास असें वाटूं लागलें कीं, आपल्यास सर्व **अयर्लंडाचा** अधिकार प्राप्त होईल तर बरें. अशा मतलबानें तो **स्त्रांगूबोला** लाभलोभ दाखवूं लागला. तो **स्त्रांगूबो** कांहीं राजाचा कामांत गुंतल्यामुळें तेथें स्वतः गेला नव्हता; मागें सांगितल्या प्रमाणें त्याणें फौज मात्र पाठविली होती. **दर्मोत** त्यास सांगूं लागला कीं, जर तुम्ही **अयर्लंड** घेतलें तर तुमची मोठी कीर्ति होईल; आणि तुम्हास या गोष्टीपासून संपत्तिही प्राप्त होईल. त्याणें **अयर्लंडातले** लोकांचा भ्याडपणा त्यास बनावून सांगितला; आणि उद्योग केला असतां निश्चय सिद्धीस जाईल, अशी त्याची खातर जमा केली. **स्त्रांगूबोनें** तें सर्व कबूल करून कोणी त्याचा सेवक होता

त्यास ७० तीरवाले बरोबर देऊन प्रथम पाठवि-
ला, नंतर राजाची आज्ञा घेऊन आपणही घोडे-
स्वार आणि शंभर तिरकमठेवाले घेऊन आता
झाला. सर्व इंग्लिशांची फौज त्यास येऊन मि-
ळाली. तेणें करून तो अजिंक्य झाला. त्या वेळेस
सर्व फौज मिळोन जरी हजारही नव्हती; तरी ते
लोक अतिशय अज्ञान होते, म्हणून तितकीच
फौज त्यांला जेथें तेथें पळवी. या गोष्टीवरून
ज्ञानी आणि अज्ञानी या लोकांत किति अंतर आ-
हे हें ध्यानांत येतें. प्रथम वाटर्फोर्ड शहर त्यांचे
स्वाधीन झालें. डब्लिन त्यांणीं हल्ला करून घे-
तलें. नंतर स्त्रांगबोनें एवेशीं लग्न केलें आ-
णि दर्मातमरतांच तो सर्व राज्य पावता झाला.

त्यानंतर किमपि विघ्न न होतां, तें सर्व बे-
ट इंग्लिशांचे स्वाधीन झालें. त्या वेळेस हे-
नरी राजाचे मनांत आवड उत्पन्न झाली कीं,
प्रजानीं जें यश मेळविलें, तें आपणास मिळावें.
म्हणून तो मग लवकरच पांचशें नैट आणि कां-
हीं

हीं शिपाई घेऊन **अयर्लंडांत** गेला. तो दुसऱ्याचें राज्य घ्यायास ह्मणून गेला नव्हता; तर स्वाधीन झालेल्या देशांत अंमल बसवायास गेला. यारीतीनें **अयर्लंड** घ्यायास श्रम बहुत पडला नाहीं, व पैकाही विशेष खर्चला नाहीं. तें **अयर्लंड** तेव्हांपासून **इंग्लंडाचे** राज्यांत चालतें.

असें राज्य प्राप्त झालें तेणेंकरून राजास परम आनंद झाला; परंतु कांहीं गृहसंबंधी संकटेंकरून त्याचें बाकीचें वय दुःखांत गेलें. तो प्रकार असा. **हेंनरी** राजामध्यें जे कितिएक दुर्गुण होते ह्मणोन सांगतात, त्यांत पराकाष्ठेच्या अनिंद्रियनिग्रह हा एक होता. **एलिनोर** ह्मणून राणी होती ती कांहीं शरीर दोषामुळें पूर्वीचा भर्त्यानें त्यागिली; तिला राजानें लोभाविष्ट चित्त होऊंन वरिली होती. तिजवर कांहीं दिवसांनी राजाची अप्रीति झाली; आणि तो इतर स्त्रियांशीं रमून विषयसुखाच्या आस्वाद घेऊं लागला. त्याची **रोझमंद क्लिफोर्द** ह्मणून एक उपस्त्री फार

चमत्कारीक होती, तिजवर हेनरीची फार प्री-ति असे.

नंतर हेनरी राजानें आपली राणी आपल्या व्यभिचारिपणामुळें विरोध करील, म्हणून त्या राखेला वुडूस्तक म्हणून लाबरिंथ* होतें त्यांत चोरून ठेविली. या रीतीनें किति दिवस चालिलें होतें, त्याचा निश्चय नाहीं. शेवटीं तें वर्तमान राणीस समजलें. तिणें रेशिमाचे कसणीवरून आपले वैरिणीजवळ जाऊन तरवार उपसून तिज कडून विष खाविवलें. ही गोष्ट खरी असो कीं खोटी असो; परंतु इतकें सत्य कीं, राजा आणि त्याचे पुत्र यांत जें वांकडें पडलें, त्याचें कारण ती राणी.

राजाचा ज्येष्ठपुत्र हेनरी होता, त्यास समजाविल्यामुळें वाटूं लागलें कीं, आपल्यास राज्याचा अधिकार असोन आपले हातीं सत्ता नाहीं, ही आपली मोटी फजीति; आणि खी जिओ-

---

* लाबरिंथ म्हणजे जा ठिकाणांत गेलें असतां, त्यांतून बाहेर निघायाची बाट फार दुर्मिळ असते तें ठिकाण.

फ्री आणि रिचर्ड हे दोघे त्याचे भाऊ होते ते ही राणीनें सांगीतल्यावरून आपल्या वांट्याचा राज्याविषयीं सत्ता करूं लागले. ते आपले भावाशीं समदुःखी झाले. मग ते राजाचे तिघे पुत्र फ्रान्स देशाचे दरबारीं निघोन गेले; आणि राणी एलीनरही कांहीं युक्ति करून तेथें आवें या बेतांत होती; परंतु राजाचे आज्ञेनें तिला धरून कैदेंत ठेविली. या सर्व गोष्टी पाहून राजास समजलें कीं, या पुढें सुखाची आशा करणें हें व्यर्थ; कारण पुत्रांस राज्य करण्या योग्य वय प्राप्त व्हायाचे पूर्वींच, बापाचें राज्य घेण्याविषयीं अतिशय उत्सुकपणा; राणी आपले अधार्मिक पुत्रांचा विरोधाची वृद्धि करिते; आणि इंग्लंडांतले राजपुत्र निर्लज्जपणें त्यांस साहाय्य करितात; या सर्व गोष्टी पाहून राजा उदास होता झाला.

या करितां राजानें सर्व लोकांचा मनांत अतिभक्ति[1] पाहून आणि दुर्दशा प्राप्त झाली

---

१ अतिभक्ति म्हणजे बुद्धीस जा गोष्टी असंभाव्य वाटता.

हा

ह्मा कांहीं देवता क्षोभ आहे असें मनांत आणून नि-श्चय केला कीं, **क्यांतर्बरींत** अतिशय जागृत **सेंट्टोमसाची** मूर्ति आहे तेथें जाऊन कांहीं प्रायश्चित करावें. मग तो **क्यांतर्बरीचे** वाटेंत देऊळ दिसों लागलें त्यापासून घोड्यावरून उतरोन शहरांत पायीं गेला; आणि त्या देवाचे पायां पडला. दुसरे दिवशीं त्याचे अपराधाची क्षमा त्यास प्राप्त झाली; आणि तो **लंडन** शहरास जाऊं लागला, तेव्हां त्याणें बातमी ऐकिली कीं, त्याच दिवशीं **स्काट** लोकांचा पराभव झाला.

त्या काळापासून राजा **हेनरीची** उत्तरोत्तर बढती होत चालिली. जा अमात्यानीं दंगा आरंभिला होता, ते त्यास शरण गेले; आणि मग थोडे दिवसानीं सर्व **इंग्लंड** देश स्वस्थ झाला. राजाचा मुलगा **हेनरी** मोठी फौज जमा करून **इं-**

---

त त्यांवर विश्वास. असें भूतें, मंत्रसामर्थ्य इत्यादिक

२ **बेकेट** मेल्यानंतर या नावानें लोक त्याची पूजा करीत असत.

ग्लंडांत येत होता; परंतु तेथें सर्व गोष्टी विप-
रीत पाहून त्याणें तो बेत ठेविला. मग लवकरच
तो ज्वर येऊन मार्तेल शहरांत मृत्यु पावला.
त्यावेळेस त्याचें वय सवीस वर्षांचें होतें. पूर्वी आ-
पण बापाशीं अधार्मिक व्यवहार केला, हें मनांत
आणून त्यास अंतीं फार पश्चात्ताप झाला. नंतर
रिचर्ड त्याचा भाऊ होता त्याणें त्याची जागा सां-
भाळिली. ती अशी कीं, जा लोभामुळें त्याचा व-
डील भाऊ पापांत पडला, तोच लोभ त्याचा मनां-
त उत्पन्न झाला.

पुनः एकवेळ धर्मयुद्धाचा बेत झाला त्यावे-
ळेस, रिचर्ड आपण अग्रेसर होऊन जय मिळा
वा या करितां आपल्या बापास बरोबर येऊं देई-
ना. त्याणें फ्रान्स् देशाचे राजाशीं ऐक्य करू-
न वचन घेतलें कीं, तुझे मनांत आहे तसें मी करी-
न. आपणास धर्मयुद्धास जायाचा उपाय नाहीं
असें पाहून, हेनरी राजानें आपला पुत्र आणि
फ्रान्स् देशाचा राजा यांशीं युद्ध करावें असा बे-

त केला. शेवटीं त्या दोघांत तह झाला, त्यांत हे-
नरी राजास अहित अशा गोष्टी बहुत ठरल्या.
ज्या अमात्यांनीं राजाशीं वैरभाव केला होता त्यां-
स राजानें क्षमा करावी असें झालें. त्यांची या-
द राजानें मागितली त्यावेळेस, त्याचा परमप्रिय
पुत्र जो जान म्हणून होता त्याचें नाव त्यांत पाहि-
लें,तेणेंकरून राजास फार क्लेश वाटले. त्याणें फार
दिवस वार्धक्य दुःख स्वस्थ मनें करून भोगिलें,
तें त्यास दुःखकारक झालें नाहीं; त्याचा मुलांनीं बं-
डें केलीं त्याणें त्यास तादृश संताप झाला नाहीं;
परंतु ज्या मुलाचें कल्याण व्हावें असें त्याचा हृदया
पासून होतें, तो आपलें शत्रुत्व करितो पाहून त्या
ला कोप आवरेनासा झाला. तो मोठ्या शोकानें
आक्रोश करूं लागला. अरे मी हतभाग्य, ज्या मा-
झा जन्म कुदिवशीं झाला. जळो तो दिवस! असें
म्हणून त्याणें आपल्या कृतघ्न मुलांस शाप दि-
ला. तो त्याणें कधीं मग फिरविला नाहीं. हृद-
यांत जितकी विशेष ममता येई तितका तो अधिक-

च

च संतापे. मग त्याचा चित्तांत एकही अंश असा
राहिला नाहीं कीं, जेथून त्यास सुख होईल; त्या
मुळें पूर्वीचें यांचल्क जाऊन तो दुःखग्रस्त होता
झाला. मग त्या हृद्रोगेंकरून त्यास जीर्ण ज्वरला-
गून तो फ्रानूस देशांत सोमुर शहराजवळ
शिनोन म्हणून स्थल आहे तेथें मेला. तेव्हां त्या-
चें वय आणि चिंता यांची समाप्ति झाली. त्या
वेळेस त्याचें वय अठ्ठावन्न वर्षांचें होतें, आणि तें
वर्ष त्याचे राज्यास पंसतिसावें; तितक्यांतच त्या-
णें मोठ्या मुत्सद्याची बुद्धि, न्यायाधीशाची सूक्ष्म
दृष्टि, आणि मोठ्या शूराचें धैर्य हे गुण दाखवि-
ले.

---

## प्रकरण ९

### प्रथम रिचर्ड राजाची कथा
### ज्याचें प्रतिष्ठानाव कुअर डिलिऑं*
### सन ११८९ पासून ११९९ पर्यंत



**रिचर्डास** राजपदवी प्राप्त झाल्यावरही धर्मयुद्धास जायाची त्याची मसलत होती. जो **स्काट्लंड** देशाच्या धनीपणा पूर्वींचा राज्यांत मिळाला होता तो या कामा करितां विकून पैका घेऊन, सर्व साहित्य तयार करून तो पुण्यभूमीस निघाला. त्या उद्योगास **फ्रान्स** देशाचा राजा ही युद्धा करितां जाणार होता; त्याणें **रिचर्डास** आपण समागमें जाऊं असे बहुत निरोप पाठविले.

**इंग्लिश** व **फ्रेंच** सैना यांचें एकत्र भेटायाचें ठिकाण **बर्गंडी** देशांत वेझेले ह्मणोन मै-

---

* कुअरडिलिऑं ह्मणजे सिंहासारिखें ज्याचें हृदय.

दान

दान ठरविलें होतें; तेथें ते दोघे जाऊन पाहूं लागले तों, फौजेंत एक लक्ष योद्धे जमले. तेथें दोघानीं एक मेकास सहाय करावें या विषयीं शपथा केल्या; आणि आपलीं सैन्यें जळ मार्गानें पुण्यभूमीस घेऊन जावें असा निश्चय केला. परंतु त्या काळीं दिवस थंडीचे होते म्हणून, ते दोघे आपल्या सैन्यासुद्धां सिसिली देशाची राजधानी जें मेसीना शहर, त्यांत उष्णकाळ येई तों पर्यंत राहिले. रिचर्ड शहराचे बाहेर एके धाकटे किल्यांत राहिला. फिलिप राजा शहरांत राहिला. त्याचें आणि सिसिलीचे राजाचें सख्य झालें. मग त्या इंग्लिश व फ्रेंच या दोन राजांत एक वेळ अविश्वास, पुनः ऐक्य असें होऊं लागलें : या सर्वांचें कारण सिसिलीचा राजा. शेवटीं सर्व तंटा मिटून ते दोघे पुण्यभूमीस निघून जाते झाले. त्यांत फ्रेंच इंग्लिशांचे पूर्वीं बहुत दिवस पोहोंचले.

त्या नंतर इंग्लिशाही सैन्य सुद्धां पालेस्ति-

---

१ पालेस्तिन प्रांतास सांप्रत इंग्रेजींत सिरिआ

न देशांत जाऊन पोंहोंचले. **रिचर्ड** आणि **फि-लिप** हे दोघे अगोदरचें वैर विसरून एकमतानें काम करूं लागले; परंतु मग थोडेच दिवसांनीं **फि-लिप** राजाचें शरीर प्रकृतीस बरें नाहींसें झाल्यामुळें, तो दहाहजार फौज मात्र **रिचर्डा** जवळ ठेऊन **फ्रान्स** देशास निघोन गेला. त्याणें फौज ठेविली तींत **बर्गेंडीचा ड्युक** मुख्य केला होता. त्यानंतर **रिचर्ड** उत्तरोत्तर विजय मेळवूं लागला. मग पुण्य नगर जें **जिरुझिलम** तें घ्यायास सोपें व्हावें, ह्मणून पूर्वीं **आस्केलन** शहर घ्यावें असा **इंग्लिश** सैन्यानें निश्चय केला. **सारासेन** राजांत परम शूर असा जो **सालाउद्दिन** राजा, तो त्यांचें निवारण करायाकरितां, तीन लाख फौज घेऊन वाटेवर राहिला होता. तो आपणास युद्ध करा-

---

असें ह्मणतात. तेथें क्रिस्ताचे जन्म मृत्यु झाले ह्मणून या देशाचें नाव पुण्य भूमी असें पूर्वीं सांगीतलें आहे.

१ सारासेन ह्मणजे तुर्क लोक.

यास योग्य आहे असें पाहून **रिचर्ड** राजास फार आनंद झाला. तेथें **इंग्लिश** पुण्य योध्यांचा जय झाला. तो असा. प्रथम **रिचर्ड** राजा आपले डावे उजवे बाजूचे लोकांची धांदल झाली असें पाहून, आपण स्वतः सैन्याचा पुढें आऊन लढाई पुनः चालू करिता झाला. या रीतीनें घोर संग्राम होऊन **सारासेन** लोक उद्विग्न आणि छिन्नभिन्न होऊन पळाले. त्या युद्धांत त्यांचे चाळीस हजार लोक पडले. मग लवकरच **आस्केलन** शहर **रिचर्डाचे** स्वाधीन झालें; दुसरीं हीं लहान लहान नगरें मग **रिचर्ड** राजास प्राप्त झालीं. या रीतीनें तो **जिरूझिलम** शहराजवळ पोहोंचला, त्या वेळेस मोठ्या हर्षानें आपली फौज पाहून, त्या कामाविषयीं आपणास सामर्थ्य आहे कीं नाहीं याचा विचार करूं लागला; तेव्हां त्यास समजलें कीं, आपलें सैन्य, दुष्काळ, श्रम, आणि विजय, याहीं करून थकलें आहे; त्यास आपण इच्छिलेलें युद्ध करायास शक्ति आणि उ-

त्साह

त्साह हीं राहिलीं नाहीं. ह्मणून त्यास सालाउ-
दिनाशीं तह करणें प्राप्त झालें. रिचर्डानें त्या-
शीं बोलणें लावून ठरविलें कीं, तीन वर्षें पर्यंत पा-
लेस्तिन देशाचे समुद्रकांठचे गांव क्रिस्तियना-
ना जवळ असावे; आणि जे कोणी क्रिस्तियन
जिरुझलमाचे यात्रेस आतील त्यांस निरुपद्र-
व जाऊं द्यावें.

त्या युद्धापासून राजास किमपि द्रव्यलाभ
न होतां केवळ कीर्तिमात्र प्राप्त झाली. त्यानंतर
रिचर्ड राजा, देशीं यायाच्या बेत करूं लागला;
मग वाटेनें त्याचें गलबत फुटोन सैन्य नाहींसें झा-
ल्यामुळें तो एकटा जर्मनी देशाचे वाटेनें यात्रे-
कन्याचा वेष करून जात असतां, मार्गांत त्यास
आस्त्रिया देशींचा ड्युक लिओपोल्ड ना-
में होता, त्याणें धरून पायांत बिड्या घालून कैदें-
त ठेविला. त्यानंतर तेथील राजा, रिचर्डास आ-
पणापाशीं मागून घेऊन लिओपोल्डावर सं-
तुष्ट होऊन त्यास कांहीं द्रव्य देता झाला. जा रि-
चर्ड

चर्ड राजाचा कीर्तीनें जग व्यापिलें होतें, त्याची अ-शी अवस्था होऊन तो परतंत्र झाला. त्याची द-शा काय झाली ती इंग्लंड देशचे लोकांस ब-हुत दिवस पर्यंत समजली नाहीं; याचें कारण अ-सें कीं, त्या समयीं दूर देशाची बातमी समजायाचें मोठें कठीण पडत असे. मग कांहीं दिवशीं फ्रान्स् देशचे एके सारंगीआल्यानें त्या राजाचा शोध लाविला अशी कथा आहे. एके दिवशीं त्या सारंग्यानें रिचर्ड राजा होता त्या किल्याचा बाहेर राहून सहज त्यास पूर्वीं आवडत होती जी गतती वाजविली. त्या वेळेस रिचर्ड राजानें आंतोन तीच गत वाजविली; तेव्हां तो समजला कीं राजा एथें आहे.

शेवटीं ती गोष्ट इंग्लिश लोकांस समजून त्याणीं त्या राजाशीं तहाचें बोलणें लाविलें. त्या वेळेस तोही समजला कीं, रिचर्ड राजास आतां सोडला नाहीं तर कठीण पडेल. मग इंग्लिशानीं त्यास १५०००० मार्क ह्मणजे ३००००० पौंड

द्यायाच्या करार केला. ते त्याणीं दिले तेव्हां, राजा **रिचर्ड** कारागृहांतून मुक्त होता झाला.

राजा **रिचर्ड** बहुत क्लेश पावून पुनः स्वदेशीं आला, हें पाहून लोक परम हर्ष पावले. तें पाहून तोही संतुष्ट होत्साता **लंडन** शहरांत मोठ्या उत्साहानें प्रवेश करिता झाला. तेव्हां लोकांनीं मोठा समारंभ केला होता तो पाहून त्याचे बरोबर **जर्मनी** देशाचे **लार्ड** आले होते ते म्हणत कीं, हे लोक इतके धनाढ्य आहेत असें ठाऊक असतें तर आमचे राजानें **रिचर्डास** इतका थोडा पैका घेऊन सोडला नसता. त्याणें मग **विंचेस्तर** शहरांत पुनः आपल्यास राज्याभिषेक करविला. नंतर **नातिंगम** शहरांत एक मोठी सभा करून सर्वांस विदित केलें कीं, बंदींतून माझी मुक्तता होऊं नये, या विषयीं माझा भाऊ **जान** याणें उद्योग केला; आणि तो आतां त्या बेतानें **फ्रान्स** देशास गेला आहे, या करिता त्या दुष्टाचें सर्व राज्य मी जप्त करून घेतों. परंतु पुढें त्याणें

त्या

त्या अपराधाची क्षमा केली, आणि असें बोलिला, कीं "जसा माझा भाऊ मी क्षमा केली हें लवकरच विसरेल, तशी त्याचे अपराधाची मला विसर पडेल तर बरें होईल."

**रिचर्ड** राजाचे मृत्यूचें कारण विचित्र झालें. तें असें. राजाचे प्रजांतून एकाचें **फ्रान्स** देशांत शेत होतें, तेथें त्याच्या चाकर खणीत असतां त्यास द्रव्याचा एक ठेवा सांपडला. तें द्रव्य आपणास जिरावें ह्मणून त्याणें त्यांतून कांहीं राजाजवळ पाठवून दिलें. परंतु **रिचर्डानें** आपण राजा ह्मणोन आपणास सर्वांचा अधिकार आहे, असा विचार करून तें सर्व सरकारांत आणायाचा हुकूम केला. तो त्याणें ऐकिला नाहीं ह्मणून, तें द्रव्य जेथें ठेविलें होतें त्या **शालस** किल्यास आऊन वेढा घातला. तो वेढा घातल्याचे चवथे दिवशीं राजा सकाळीं घोड्यावर बसून कोठून हल्ला करावा हें पहाया करितां चालिला होता; इतक्यांत कोणी एक बे-

ग्राम..

स्नामंडी गौर्दन ह्मणून होता, त्याणें तीर मारिला तो त्याचे खांद्यास लागला. ती जखम कांहीं मोठी नव्हती, परंतु कोणी एका मूर्ख वैद्यानें ते तीर काढायाचा उद्योग केला, तेव्हां तीजडावून राजास मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. त्याणें आपला अंतकाळ जवळ आला पाहून मृत्युपत्र केलें; त्यांत सर्व राज्य जान नामें भाऊ होता त्याणें करावें असें लिहून ठेविलें; आणि आमदार स्वान्याचा तोच अधिकारी केला. परंतु त्यांतील चौथा हिसा द्रव्य मात्र चाकरांस वांटून दिलें. त्याणें आज्ञा केली कीं, ज्याणें मला तीर मारिला त्यास माझेपाशीं घेऊन या. त्यास जवळ आणिल्यानंतर विचारिलें, अरे तूं मला निरर्थक मारिलेंस याचें कारण काय? मी तुझा असा अपराध काय केला? तो बोलिला राजा ऐक," तूं माझा बाप आणि दोघे भाऊ यांचा जीव घेतलास, आणि मलाही फाशीं द्यायाचा तुझा बेत होता. आतां मी तुझा हस्तगत झालों आहें; तूं मला मारून माझे अपराधाचें शासन

न कर; तें भोगून मला सुखच होईल; कारण याविशवांतून तुझा सारिखा दुष्ट राजा काढून टाकिला एवढा माझे हातीन लोकांवर उपकार घडला." हें उत्तर ऐकून विस्मित होत्साता **रिचर्ड** राजा त्यास १०० **शिलिंग** देऊन सोडून द्यावा अशी आज्ञा देता झाला; परंतु त्याचा **मार्केडी** नामें घातुक सरदार होता त्याणें तें न ऐकतां, जीवंतपणींच त्याचे आंगावरची चामडी काढून फांशीं देऊन त्यास मारून टाकिला.

**रिचर्ड** राजा राज्य करूं लागल्यापासून दहावेवर्षीं मृत्यु पावला. त्यावेळेस त्याचे वयास बावन्नावें वर्ष होतें. त्यास **फिलिप** या नावाचा एकच मात्र पुत्र होता.

---

द्यायाच्या करार केला. ते त्याणीं दिले तेव्हां, राजा **रिचर्ड** कारागृहांतून मुक्त होता झाला.

राजा **रिचर्ड** बहुत क्लेश भवून पुनः स्वदेशीं आला, हें पाहून लोक परम हर्ष पावले. तें पाहून तोही संतुष्ट होत्साता **लंडन** शहरांत मोठ्या उत्साहानें प्रवेश करिता झाला. तेव्हां लोकांनीं मोठा समारंभ केला होता तो पाहून त्याचे बरोबर **जर्मनी** देशाचे **लार्ड** आले होते ते ह्मणत कीं, हे लोक इतके धनाढ्य आहेत असें ठाऊक असतें तर आमचे राजानें **रिचर्डास** इतका थोडा पैका घेऊन सोडला नसता. त्याणें मग **विंचेस्तर** शहरांत पुनः आपल्यास राज्याभिषेक करविला. नंतर **नातिंगम** शहरांत एक मोठी सभा करून सर्वांस विदित केलें कीं, बंदींतून माझी मुक्तता होऊं नये, या विषयीं माझा भाऊ **जान** याणें उद्योग केला; आणि तो आतां त्या बेतानें **फ्रान्स** देशास गेला आहे, या करिता त्या दुष्टाचें सर्व राज्य मी जप्त करून घेतों. परंतु पुढें त्याणें

त्या

त्या अपराधाची क्षमा केली, आणि असें बोलिला, की "असा माझा भाऊ मी क्षमा केली हें लवकरच विसरेल, तशी त्याचे अपराधाची मला विसर पडेल तर बरें होईल."

• रिचर्ड राजाचे मृत्यूचें कारण विचित्र झालें. तें असें. राजाचे प्रजांतून एकाचें फ्रान्स देशांत शेत होतें, तेथें त्याचा चाकर खणीत असतां त्यास द्रव्याचा एक ठेवा सांपडला. तें द्रव्य आपणास जिरावें म्हणून त्याणें त्यांतून कांहीं राजाजवळ पाठवून दिलें. परंतु रिचर्डानें आपण राजा म्हणोन आपणास सर्वांचा अधिकार आहे, असा विचार करून तें सर्व सरकारांत आणायाचा हुकूम केला. तो त्याणें ऐकिला नाहीं म्हणून, तें द्रव्य जेथें ठेविलें होतें त्या शालस किल्यास जाऊन वेढा घातला. तो वेढा घातल्याचे चवथे दिवशीं राजा सकाळीं घोड्यावर बसून कोठून हल्ला करावा हें पहाया करितां चालिला होता; इतक्यांत कोणी एक बे-

यामंडी गोर्दन ह्मणून होता, त्याणें तीर मारिला तो त्याचे खांद्यास लागला. ती जखम कांहीं मोठी नव्हती, परंतु कोणी एका मूर्ख वैद्यानें तें तीर काढयाचा उद्योग केला, तेव्हां तीजडावून राजास मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. त्याणें आपला अंतकाळ जवळ आला पाहून मृत्युपत्र केलें; त्यांत सर्व राज्य जान नामें भाऊ होता त्याणें करावें असें लिहून ठेविलें; आणि आमदार खान्याचा तोच अधिकारी केला. परंतु त्यांतील चौथा हिसा द्रव्य मात्र चाकरांस वांटून दिलें. त्याणें आज्ञा केली कीं, जाणें मला तीर मारिला त्यास माझेपाशीं घेऊन या. त्यास जवळ आणिल्यानंतर विचारिलें, अरे तूं मला निरर्थक मारिलेंस याचें कारण काय? मी तुझा असा अपराध काय केला? तो बोलिला राजा ऐक," तूं माझा बाप आणि दोघे भाऊ यांचा जीव घेतलास, आणि मलाही फाशीं द्यायाचा तुझा बेत होता. आतां मी तुझा हस्तगत झालों आहें; तूं मला मारून माझे अपराधाचें शास-

न कर; तें भोगून मला सुखच होईल; कारण या विश्वांतून तुझ्या सारिखा दुष्ट राजा काढून टाकिला एवढा माझे हातीन लोकांवर उपकार घडला." हें उत्तर ऐकून विस्मित होत्साता रिचर्ड राजा त्यास १०० शिलिंग देऊन सोडून द्यावा अशी आज्ञा देता झाला; परंतु त्याचा मार्केडी नामें घातुक सरदार होता त्याणें तें न ऐकतां, जीवंतपणींच त्याचे आंगावरची चामडी काढून फांशीं देऊन त्यास मारून टाकिला.

रिचर्ड राजा राज्य करूं लागल्यापासून दहावेवर्षीं मृत्यु पावला. त्यावेळेस त्याचे वयास बावन्नावें वर्ष होतें. त्यास फिलिप या नावाचा एकच मात्र पुत्र होता.

# प्रकरण २०

## जान राजाची कथा

### सन ११९९ पासून १२१६ पर्यंत



**जान** राजा सिंहासनारूढ होतांच, लाग-लाच तो आपल्या पुतण्याचें जें लहानसें राज्य होतें, तें घ्यायाचा उद्योग करूं लागला. त्यामध्यें गर्व आणि दौरात्म्य हे मोठे दुर्गुण होते; त्यांहीं करून लोकांची त्यावर किमपि प्रीति नव्हती. त्यांत, जो त्याचा पुतण्या **आर्थर** सर्व राज्याचा वास्तवीक अधिकारी, त्यास कैदेंत ठेऊन त्याणें आपले हातें मारिला; ह्मणून लोकांस त्याचा फारच कंटाळा आला.

---

१ पूर्वीं जिओफ्री ह्मणोन रिचर्ड राजाचा भाऊ सांगी-तला, त्याचा मुलगा **आर्थर** नामें होता तो.

प्रजांस त्याचा संताप येई खरा, परंतु त्याची सत्ता नाहींशीं करवेना. पुढें देवानें असें घडलें कीं, सभासद लोकांत परस्परें वैर पाडायाचें त्या मध्यें गुण नाहीं, ह्मणूनच तेच त्याचे शत्रु झाले. तें असें. कांहीं दिवस धर्मपक्षी, राजाचा दरकार न ठेवितां स्वतंत्रपणें वागत असत; आणि त्यांचा नेमणुका पोपच करीत असे; त्याचा मात्र आज्ञा ते मानीत. परंतु आर्चबिशपाचे नेमणुकीविषयीं धर्मपक्षी, आणि आगुस्तिनाचे मतानुसारी जे महंत, त्या दोघांमध्यें तंटा होत असे. आर्चबिशपाचें नेमणुकी विषयीं त्या दोघांसही अधिकार आहे या विषयीं पूर्वींचें भोग्य होतें. जान राजानें बिशपांचा पक्ष धरिला; आणि आपले स्वारींतले दोन नैट त्या महंतांस मठांतून लावून द्याया करितां आणि त्यांचा सर्व वसूल जप्त करया करितां पाठविले. असें वैमनस्य पडलें तें पोपास केवळ अनिष्ट नव्हतें. ह्मणून त्या दोन पक्षींचा मुख्यानीं जो पुरुष नेमिला

मिळा होता तो टाकून त्याणें तिसराच एक स्तीफन लांग्तन या नावाचा पुरुष आर्चबिशपाचे जागेवर नेमिला. तो राजास संमत झाला नाहीं, ह्मणून सर्व राज्यास पोपानें बहिष्कार घातला. हें भयंकर कर्म पाहून लोक फार भय पावले; कारण कीं, लोकांचे अज्ञान चित्तांत ही गोष्ट फार वाईट झाली असें वाणलें. मग ईश्वरभजन[1] बंद झालें; बाप्तिस्मा[2] वांचून इतर सर्व संस्कार होईनात; देउळाचे दरवाजे लागले; महंताचा मूर्ति रस्त्यावर पडूं लागल्या; प्रेतास पुराव्याचा संस्कार न करितां, तीं खाडयांत किंवा रस्त्यावर पडायाचा प्रारंभ झाला. असा अनर्थ झाला.

---

१ ईश्वरभजन ह्मणजे आदित्यवार इत्यादि पर्वणीस देवळामध्यें एक धर्मपक्षी उभा राहून ईश्वराचे गुण वर्णितो, आणि इतर लोक बसून ऐकतात तें.

२ बाप्तिस्मा ह्मणोन एक संस्कार आहे; जो झाला असता ख्रिस्तियन धर्माचा अधिकार होतो.

त्या

त्या वेळेस राजा जान परम संकटावस्थें-
त पडला. अशी गोष्ट सांगतात कीं, आपल्या
मौर्ख्यें करून संतप्त, प्रजांविषयीं साशंक, आणि
जो दिसेल त्याविषयीं शत्रुबुद्धि, असा होत्साता तो
एके रात्रीस नातिंगम शहरचे किल्यांत चिंता क-
रीत एकटाच बसला होता; आणि जवळ कोणास
येऊं देईना. पुढें आपलें राज्य पोपानें फ्रान्स
देशाचे राजास दिलें, आणि तें घ्याया करितां तो त-
यारी करितो आहे; असें ऐकून त्याचा मनांत कि-
ती भय वाटलें असेल बरें? तसें असतांही शत्रूं-
चा पराजय कराया विषयीं यत्न करायास तो सम-
र्थ झाला. तें असें. तो लोकांस फार अप्रिय होता
खरा, परंतु इंग्लिश आणि फ्रेंच यामध्यें सु-
रुवातीपासून वैर होतें; जानास राजा असें म्हणत
असत; आणि त्याचे जवळ तेव्हांही कांहीं सामर्थ्य
होतें; या कारणामुळें त्यापाशीं साठ हजार फौज ज-
मली; इतकी फौज त्या कामास पुष्कळ होती, परं-
तु ती भरंवसा ठेवाया जोगी नव्हती. ही सेना घे-

ऊन